**स्वाईन फ्ल्यू आजारावर खाजगी रुग्णालयात गंभीरस्थितीत जीवनावश्यक प्रणालीवर उपचार घेणाऱ्या रुग्णांना प्रलंबित वैद्यकीय खर्चाची प्रतीपुर्ती अदा करणे बाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः पुरमा-२०२२/प्र.क्र.१०२/आरोग्य-५**
गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार,
८ व १० वा मजला,मंत्रालय, मुंबई
तारीख: ३१ मार्च,२०२३

**वाचा -**

१) शासन निर्णय क्रमांकः सार्वजनिक आरोग्य विभाग क्रमांक: स्वाईन-२०१५/प्र.क्र.११३/आ-५, दि.२०/०३/२०१५
२) संचालक, आरोग्य सेवा ,संचालनालय, पुणे यांचे पत्र क्र.एमजीएस/लेखाशाखा/स्वाईन फ्ल्यू देयके प्रतिपूर्ती/ मंजूर पुरवणी मागणी अनुदान उपलब्धता/क्ष-७१/१५४७६-७८/२२ दि.१३.०९.२०२२
३) शासन निर्णय क्रमांकः सार्वजनिक आरोग्य विभाग क्रमांक: पुरमा-२०२२/प्र.क्र.१०२/आरोग्य-५, दि.३१/१०/२०२२
४) संचालक, आरोग्य सेवा ,संचालनालय, पुणे यांचे पत्र क्र.एमजीएस/लेखाशाखा/स्वाईन फ्ल्यू देयके प्रतिपूर्ती/ मंजूर पुरवणी /उर्वरित अनुदान/कक्ष-७१/१६८७-८९/२३ दि.१४.०२.२०२३

**प्रस्तावना-**

सार्वजनिक आरोग्य विभागामार्फत दिनांक २० मार्च २०१५ नुसार स्वाईन फ्ल्यू या आजाराने बाधित खाजगी रुग्णालयात गंभीरस्थितीत जीवनावश्यक प्रणालीवर उपचार घेतलेल्या रुग्णांना वैद्यकीय खर्चाची प्रतिपूर्ती करण्याचा निर्णय घेण्यात आलेला आहे.

संचालक, आरोग्य सेवा ,संचालनालय, पुणे यांनी शासनास सादर केलेल्या प्रस्तावानुसार स्वाईन फ्ल्यू या आजाराने बाधित गंभीर स्थितीत जीवनावश्यक प्रणालीवर खाजगी रुग्णालयात उपचार घेतलेल्या रुग्णांना सन २०१८-१९ पासून प्रलंबित वैद्यकीय खर्चाची प्रतिपूर्ती रुपये ३,३०,००,०००/- (अक्षरी रुपये तीन कोटी तीस लाख रुपये फक्त) इतक्या निधीची पुरवणी मागणी विधीमंडळाचे पावसाळी अधिवेशन २०२२ मध्ये सादर करण्यात आली होती. त्यानुसार रुपये ३,३०,००,०००/- (अक्षरी रुपये तीन कोटी तीस लाख रुपये फक्त) इतक्या रक्कमेची पुरवणी मागणी मंजूर करण्यात आली होती. सदर पुरवणी मागणीतील रकमेच्या ५० टक्केच्या मर्यादेत म्हणजेच रुपये १,६५,००,०००/- (अक्षरी रुपये एक कोटी पासष्ठ लाख रुपये फक्त) एवढा निधी वित्त विभागाने बी.डी.एस.प्रणालीवर उपलब्ध करून दिला होता. त्यानुषंगाने दि.३१.१०.२०२२ च्या शासन निर्णयान्वये सदरचा निधी वितरीत करण्यात आला आहे. आता उर्वरित रुपये १,६५,००,०००/- (अक्षरी रुपये एक कोटी पासष्ठ लाख रुपये फक्त) एवढी रक्कम वितरीत करण्यास वित्त विभागाने मान्यता दिल्याने सदर रक्कम वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

१) शासन निर्णय दिनांक २० मार्च २०१५ अन्वये राज्यातील खाजगी रुग्णालयात स्वाईन फ्ल्यू आजारावर ज्या रुग्णांनी गंभीरस्थितीत जीवनावश्यक प्रणाली किंवा तत्सम लाईफ सपोर्टवर (Ventilator) उपचार घेतले आहेत, अशा रुग्णांना वैद्यकीय खर्चाची प्रतिपूर्ती करण्यास शासन मंजुरी देण्यात आली आहे. या शासन निर्णयान्वये स्वाईन फ्ल्यू या आजाराने बाधित गंभीरस्थितीत जीवनावश्यक प्रणालीवर खाजगी रुग्णालयात उपचार घेतलेल्या रुग्णांना सन २०१८-१९ पासून प्रलंबित वैद्यकीय खर्चाची प्रतिपूर्ती करण्याकरिता उर्वरित रुपये १,६५,००,०००/- (अक्षरी रुपये एक कोटी पासष्ठ लाख रुपये फक्त) एवढा निधी उपलब्ध करून देण्यात येत आहे.

२) सदर शासन निर्णयानुसार प्राप्त होणाऱ्या वैद्यकीय खर्चाच्या प्रतिपुर्तीचे प्रस्तावास मंजुरीसाठी दिनांक २० मार्च, २०१५ च्या शासन निर्णयातील अटी व शर्ती लागू राहतील. सदरील खर्च मागणी क्र. आर-१, २२१०-वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, राज्य योजनाअंतर्गत योजना,१०१-रोग प्रतिबंध व नियंत्रण,(०१)- रोग प्रतिबंध व नियंत्रण (०६) पटकी नियंत्रण कार्यक्रम (राज्य क्षेत्र) ,१३-कार्यालयीन खर्च, सांकेतांक (२२१० ०६२९) (अनिवार्य खर्च) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

**३) तसेच दिनांक २० मार्च २०१५ रोजीच्या शासन निर्णयान्वये सुरू करण्यात आलेली स्वाईन फ्ल्यू या आजाराने बाधित गंभीरस्थितीत जीवनावश्यक प्रणालीवर खाजगी रुग्णालयात उपचार घेतलेल्या रुग्णांना १ एप्रिल, २०२२ पासून पूर्वलक्षी प्रभावाने देण्यात येणारी वैद्यकीय प्रतिपुर्ती दि.३१.१०.२०२२ च्या शासन निर्णयान्वये बंद करण्यात आलेली आहे. त्यामुळे यापुढील वैद्यकीय प्रतिपुर्ती देय राहणार नाही.**

४) सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. १४१/२०२३/व्यय-१३ दिनांक २८.०३.२०२३ अन्वये दिलेले मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३३११३२५३३५०१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

KIRANKUMAR VASANTRAO WAHUL

Digitally signed by KIRANKUMAR VASANTRAO WAHUL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=cc9db72365b55a7409cd8ad3c479621cc9f4985e6d1be8dd4cd1c4fdab3cbb14, pseudonym=5AD6BC99C173E8D779171190F8192DAE8D5E1557, serialNumber=2E35734EC976BF5657815FB42C4D25B0B3C23B4C69600638F3DEB172AC9E37F4, cn=KIRANKUMAR VASANTRAO WAHUL
Date: 2023.03.31 14:34:29 +05'30'

**(किरण वाहुल)**

**उप सचिव महाराष्ट्र शासन**

प्रत-

१. प्रधान सचिव, मा.मुख्यमंत्री सचिवालय,मंत्रालय, मुंबई.

२. मा.मंत्री (सर्व), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. सर्व अप्पर मुख्य सचिव/प्रधान सचिव/ सचिव, मंत्रालय, मुंबई
४. जिल्हाधिकारी,सर्व
५. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई/पुणे
६. सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थसंकल्प व प्रशासन), पुणे-१.
७. उपसंचालक, आरोग्य सेवा मंडळे (सर्व).
८. जिल्हा शल्य चिकित्सक, सर्व
९. अधिष्ठाता, शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, सर्व
१०. खाजगी रुग्णालयातील मुख्य कार्यकारी अधिकारी /प्रशासकीय अधिकारी (संचालक, आरोग्य सेवा, पुणे यांचे कार्यालयामार्फत)
११. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर.
१२. जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व).
१३. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
१४. निवासी लेखाधिकारी, मुंबई.
१५. वित्त विभाग, (व्यय-१३),(अर्थसंकल्प-३, अर्थसंकल्प-९), मंत्रालय, मुंबई-३२
१६. अवर सचिव, (अर्थसंकल्प), सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३.निवड नस्ती